**उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय कनिष्ठ महाविद्यालये/संस्थांमध्ये घडयाळी तासिका तत्वावर कार्यरत असलेल्या कनिष्ठ अधिव्याख्याता यांना प्रदान करावयाच्या मानधनाचे दर सुधारित करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : अर्थसं-२०२२/प्र.क्र.१०५/(२)/मशि-३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २७ मार्च, २०२३.

वाचा : १) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्रमांक- एससीपी-२००८/(१४३/०८)/मशि-२, दिनांक २८ जानेवारी, २००९.
२) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्रमांक- संकीर्ण-२०२१/(७५/२१)/(२)/मशि-३, दिनांक २२ ऑक्टोबर, २०२१.

प्रस्तावना:

उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अख्यत्यारितील उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय कनिष्ठ महाविद्यालयात एखाद्या विषयासाठी अर्धवेळ शिक्षकासाठी आवश्यक असलेला कार्यभार उपलब्ध होऊ शकत नसल्यास अशा विषयाच्या अध्यापनासाठी घडयाळी तासिका तत्वावर अधिव्याख्यात्यांची नेमणूक करण्यात येते. संदर्भाधिन शासन निर्णयान्वये उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय कनिष्ठ महाविद्यालयातील घडयाळी तासिका तत्वावर कार्यरत असलेल्या अधिव्याख्यात्यांना लागू करण्यात आलेल्या मानधनाच्या दरात सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:

उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय कनिष्ठ महाविद्यालयातील घडयाळी तासिका तत्वावर कार्यरत असलेल्या अधिव्याख्यात्यांच्या मानधनाच्या दरात पुढीलप्रमाणे वाढ करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | कनिष्ठ अधिव्याख्याता | दि. २२/१०/२०२१ च्या शा.नि. अन्वये अनुज्ञेय दर (प्रति तास) | सुधारीत दर (प्रति तास) |
|---|---|---|---|
| १ | प्रशिक्षित कनिष्ठ अधिव्याख्याता | रु.१५०/- | रु.३००/- |
| २ | अप्रशिक्षित कनिष्ठ अधिव्याख्याता | रु.१२०/- | रु.२५०/- |

२. सदरहू सुधारित दर दिनांक ०१ एप्रिल, २०२३ पासून अनुज्ञेय होतील.

३. याकरीता होणारा खर्च हा मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.२७९/२०२३/व्यय-५, दिनांक १३/०३/२०२३ नुसार प्राप्त झालेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२३०३२७१९४६३२९४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PRATAP PANDURANG LUBAL

Digitally signed by PRATAP PANDURANG LUBAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=b0d6763338fc6cc4f7cf07ca60db7abc1cfac99c84ab1b5bfc0dae4609d631d0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AF6895C47A84066432F5BDD1F182B4163D880AC9BD8D24A198FD0E7310BBEB59, cn=PRATAP PANDURANG LUBAL
Date: 2023.03.27 19:51:09 +05'30'

**( प्रताप पां. लुबाळ )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन मलबार हिल, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मंत्री ( उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. संचालक,उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य,पुणे.
७. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
८. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. सहसंचालक, उच्च शिक्षण, सर्व विभागीय कार्यालये, महाराष्ट्र राज्य.
१०. प्राचार्य/संचालक, शासकीय महाविद्यालये/संस्था (सर्व)
११. सर्व कार्यासने (मशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. कार्यासन साशि-१, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३. निवड नस्ती, मशि-३, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.